/ gr-75

जिल्हा होमगार्डसाठी बँड साहित्य
खरेदी करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)
शासननिर्णय, क्र.: एचजीएस २१००/८१९/७५/विशा.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १८ जानेवारी, २००३.

वाचा :- महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक: मस-०३/ २००१/ ४६९०,दिनांक १३.६.२००१ आणि क्रमांक: मस-३/५८/बँड/२००१/५६७१, दिनांक ६.८.२००१

शासननिर्णय :- [redacted] प्रशिक्षणा दरम्यान कवायत, शस्त्र कवायत तसेच होमगार्ड वर्धापन दिन, १५ ऑगस्ट व २६ जानेवारी इ. प्रसंगी बँडची आवश्यकता आहे. प्रत्येक जिल्हा होमगार्डकरिता सन १९६४-६५ मध्ये बँड पथक निर्माण करुन त्यांना ब्रास बँड साहित्य पुरविले होते. सदर बँड साहित्य जुने व निकामी झाल्यामुळे त्याबदली नविन बँड साहित्य पुरविणे आवश्यक बनले आहे. सर्व जिल्हयांसाठी नविन बँड साहित्य पुरविण्यासाठी लागणारा खर्च मोठा असल्याने ३ टप्प्यांन्वये बँड साहित्य पुरविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील नमूद बँड साहित्याचा १ संच या प्रमाणे पहिल्या टप्प्यान्वये जिल्हा प्रशिक्षण केंद्र, नागपूर / उस्मानाबाद/ रायगड/ रत्नागिरी/ ठाणे/ सातारा या जिल्हा होमगार्ड कार्यालयांना आणि मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, मुंबई कार्यालयासाठी बँड साहित्याचे २ संच खरेदी करुन पुरविण्यास व त्यासाठी येणा-या रु. ४,००,०००/- ( रु. चार लक्ष फक्त ) रकमेच्या खर्चास शासन मंजूरी देत आहे. बँड साहित्याची खरेदी शासन निर्णय , उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस - १०८८/(२५१२)/उद्योग-६/ दि. २.१.९२ मधील सुचनांनुसार विहित पध्दतीने ( निविदा मागवून) करण्यात यावी.

२. हा खर्च मागणी क्रमांक बी-१ -"२०७०, इतर प्रशासनिक सेवा-१०७ होमगार्ड- (००)-(०१)- होमगार्ड- ३३- सामुग्री व पुरवठा " या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २००२-०३ च्या आर्थिक वर्षात हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: सीआर-११६५/२००२/व्यय-८, दिनांक २२.१०.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( भा. रा. शौरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, घाटकोपर, मुंबई
जिल्हा समादेशक, होमगार्ड, नागपूर/ उस्मानाबाद/ रायगड/ रत्नागिरी/ठाणे/सातारा
महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८ / अर्थसंकल्प-१०), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग (पोयुडी-१), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती. विशा-८

**शा.नि.शा.शि. क्र. एसबीएस २१००/८११/७७/विशा ८, दिनांक १८ जाने. २००३**

**सोबतचे विवरणपत्र (एका बँड पथकासाठी लागणारे बँड साहित्य)**

| अ.क्र. | बँड साहित्याचे नांव | पथकासाठी लागणारे नग |
|---|---|---|
| १ | क्लॅरीनेट | ३ नग |
| २ | कॉरनेट | ३ नग |
| ३ | सॅक्सोफोन | २ नग |
| ४ | युफोनियम | १ नग |
| ५ | ट्रमबोन | १ नग |
| ६ | फ्लूट | १ नग |
| ७ | शाम | १ नग |
| ८ | झल्लरी | १ नग |
| ९ | बास ड्रम (मोठा ढोल ) | १ नग |
| १० | साप ड्रम (डफली ) | १ नग |
| ११ | बँड मास्तर स्टीक | १ नग |
| १२ | साईड ड्रम | १ नग |
| १३ | ड्रेस | १८ नग |